**प्रधानमंत्री पीक विमा योजना खरीप हंगाम सन २०१७ साठी उस्मानाबाद व लोहारा तालुक्यातील शेतकऱ्यांना नुकसान भरपाईची रक्कम वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रपिवियो-२०१८ /प्र.क्र.११२/११ अे,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
तारीख: ११ मार्च, २०२०

संदर्भ :-

१) मा. उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ यांनी जनहित याचिका क्र.१४१/२०१८ संदर्भात दि.१५.०७.२०१९ रोजी दिलेले निर्देश.
२) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१८/प्र.क्र.११२/११-अे, दि.७.०८.२०१९ व दि.१४.८.२०१९.
३) शासन निर्णय महसूल व वन (म. व पु.) विभाग क्र. एससीवाय -०८/२०१९/ प्र.क्र.६१ / म-११, दि. २१.८.२०१९.
४) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्र. प्रपिवियो-२०१८/प्र.क्र.११२/११-अे, दि.२७.०८.२०१९.
५) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र. सां-८/प्रपिवियो/९०९२/२०२०, दि.४.३.२०२०.

प्रस्तावना :-

उपरोक्त संदर्भ क्र. (१) येथील मा. उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ औरंगाबाद यांनी जनहित याचिका क्र.१४१/२०१८ प्रकरणी दि.१५.०७.२०१९ रोजी दिलेल्या आदेशास अनुसरून संदर्भ क्र. (२) व (३) येथील शासन निर्णयान्वये प्रधानमंत्री पिक विमा योजना खरीप हंगाम २०१७ मध्ये उस्मानाबाद व लोहारा तालुक्यातील सोयाबीन पिकाच्या विम्यापासून वंचित राहीलेल्या शेतकऱ्यांना पीक विमा नुकसान भरपाई देण्याचे आदेश निर्गमित केले आहेत. याअनुषंगाने संदर्भ क्र. (४) येथील शासन निर्णयान्वये उस्मानाबाद व लोहारा तालुक्यातील ८१७४२ शेतकऱ्यांना नुकसान भरपाईसाठी रु.२९.९४ कोटी इतका निधी उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे. आयुक्त कार्यालयाने संदर्भ क्र. (५) येथील पत्रान्वये कळविल्यानुसार सोयाबीन पिकाच्या विम्यापासून वंचित राहीलेल्या उस्मानाबाद जिल्हयातील उस्मानाबाद व लोहारा तालुक्यातील शेतकऱ्यांना पीक विमा नुकसान भरपाईसाठी आवश्यक असलेली अतिरीक्त रक्कम रु.३.५४ लाख इतका निधी वितरीत करावयाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

प्रधानमंत्री पिक विमा योजना खरीप-२०१७ मध्ये सोयाबीन पिकाच्या विम्यापासून वंचित राहीलेल्या उस्मानाबाद जिल्हयातील उस्मानाबाद व लोहारा तालुक्यातील शेतकऱ्यांना नुकसान भरपाई देण्यासाठी अतिरीक्त रक्कम रु.३.५४ लाख इतका निधी वितरीत करण्यात येत आहे.

२. सदरचा निधी खालील लेखाशिर्षाखाली खर्च करण्यात यावा:-

मागणी क्रमांक सी-६,

२२४५- नैसर्गिक आपत्तीमळे पीक नुकसानीकरिता सहाय्य,

(९२) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानका व्यतिरीक्त खर्च,

(९२) (०९) नैसर्गिक आपत्तीमळे पीक नुकसानीकरिता शेतकऱ्यांना मदत (अनिवार्य),

३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२४५ २१६७).

३. वितरीत करण्यात यणाऱ्या निधीच्या आहरण व संवितरणासाठी पुढीलप्रमाणे नियंत्रण म्हणून आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे व आहरण व संवितरण अधिकारी म्हणून सहाय्यक संचालक (लेखा), कृषि, आयुक्तालय, पुणे घोषित करण्यात येत आहेत.

४. सदरची नुकसान भरपाई ही पात्र शेतकऱ्यांच्या रकमेची परिगणना विम्याच्या निकषानुसार करून ती रक्कम पिक विमा योजनेच्या प्रचलीत पध्दतीनुसार शेतकऱ्याच्या बँक खात्यात थेट जमा करावी.

५. सदर निधी संदर्भ क्र (२) व (३) च्या शासन निर्णयातील अटी व शर्तीची पूर्तता करण्यात येईल या अटीच्या अधिन राहून वितरीत करण्यात येत आहे.

६. प्रस्तूत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१११६४९१६२५०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BALASAHEB K RASKAR

Digitally signed by BALASAHEB K RASKAR
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=aaa93f4d4e49359ddfdb4a9eb4176d16d9032454ac5c700ad6e2a7ad0b3115db, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=2cf78d68ceeac33ca63c8a2f2b360ebf1c6ac77c6a1ad4c5bfb24951806af0a8, ou=AGRICULTURE DIARY AND FISHERTES DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=BALASAHEB K RASKAR
Date: 2020.03.11 16:54:48 +05'30'

**( बा. कि. रासकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) सचिव (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई-३२

२) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

३) संचालक (वि.प्र.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

४) मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई

६) सहाय्यक संचालक (लेखा), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे

७) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे

८) जिल्हाधिकारी, उस्मानाबाद

९) जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी, उस्मानाबाद

१०) महालेखापाल, महाराष्ट्र -१/२, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर

११) वित्त विभाग (व्यय-१/अर्थ.१३), मंत्रालय, मुंबई- ३२

१२) उप सचिव (११-अे/२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक

१३) कक्ष अधिकारी (२- अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई -३२

१४) विभागीय व्यवस्थापक, भारतीय कृषि विमा कंपनी, स्टॉक एक्सचेंज टॉवर्स, २० वा मजला, दलाल स्ट्रीट,फोर्ट, मुंबई-४०००२३

१५) निवड नस्ती (कार्यासन ११-अे).